**स्वतंत्र मराठी भाषा विभागाची स्थापना**

**महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**क्र.मभावा-२०१०/४५८/प्र.क्र.९५(भाग २)/२०-ब,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक :- २२ जुलै, २०१०.**

**प्रस्तावना** :-

मराठी भाषेशी संबंधित भाषा संचालनालय व राज्य मराठी विकास संस्था ही कार्यालये सामान्य प्रशासन विभाग आणि मराठी विश्वकोश मंडळ व महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ ही कार्यालये पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या नियंत्रणाखाली आहेत. मराठी भाषेशी संबंधित सर्व विषय एकत्रितपणे हाताळण्यासाठी एकच स्वतंत्र विभाग असावा व या स्वतंत्र विभागासाठी स्वतंत्र सचिवांची नियुक्ती करून मराठी भाषेच्या सर्वांगीण विकासासाठी राबवावयाच्या योजना, संबंधित संस्था या एकाच विभागाच्या कार्यक्षेत्राखाली आणण्याचे प्रस्तावित होते. मराठी भाषेशी संबंधित कामकाज पाहणारी कार्यालये / संस्था, विविध मंत्रालयीन विभाग यांचेकडून समन्वयाचा अभाव आढळून येत असल्यामुळे सर्व भाषा विषयक यंत्रणा राबविण्यासाठी स्वतंत्र राजभाषा विभागाची स्थापना करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

२. मराठी भाषेच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीकोनातून महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षामध्ये मराठी भाषेशी संबंधित कार्यालये / संस्था / मंडळे एकाच विभागाच्या नियंत्रणाखाली आणण्याचा व त्यासाठी स्वतंत्र मराठी भाषा विभाग स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार महाराष्ट्र शासनाच्या स्वतंत्र मराठी भाषा विभाग स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत असून नव्याने निर्माण करण्यात येणाऱ्या विभागामध्ये महाराष्ट्र शासन कार्य नियमावलीच्या अनुसूचीमधील सामान्य प्रशासन विभाग, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग आणि शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांच्या सध्या अखत्यारित असलेले मराठी भाषेशी संबंधित विषय, नवनिर्मित मराठी भाषा विभागांतर्गत वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. मराठी भाषाविषयक कामकाज पाहणारे भाषा संचालनालय, राज्य मराठी विकास संस्था, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ इत्यादी कार्यालये / संस्था / मंडळे मराठी भाषा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली वर्ग करण्यास व ही कार्यालये / संस्था / मंडळे महाराष्ट्र शासन कार्य नियमावलीमध्ये ज्या इतर प्रशासकीय विभागाच्या विषयसूचीत सध्या अंतर्भूत आहेत ते त्यामधून कमी करण्यास मान्यता देण्यात येत आहे. याबद्दलची आवश्यक ती अधिसूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहे.

४.	या प्रशासकीय विभागासाठी स्वतंत्र सचिवांचे पद निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे. नवनिर्मित मराठी भाषा विभागासाठी आवश्यक पदे सध्या हे कामकाज हाताळणाऱ्या विभागातून मराठी भाषा विभागास हस्तांतरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. अशा हस्तांतरणानंतरही पदांची आवश्यकता राहिल्यास, मुख्य सचिवांचे अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीसमोर प्रस्ताव सादर करून आवश्यकतेप्रमाणे नवीन पदे निर्माण करून घेण्याची कार्यवाही करण्यात येईल. नवीन मराठी भाषा विभागासाठी सन २०१०-११ करिता उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतुदीव्यतिरिक्त अतिरिक्त निधी उपलब्ध करून घेण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येत आहे.

५.	मराठी भाषा विभाग लवकर कार्यान्वित होण्याच्या दृष्टीने मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली मराठी भाषा विभाग कार्यान्वित होईपर्यंत शासन निर्णय क्रमांक : शप्रस-२०१०/प्र.क्र.-११६/२०-ब, दिनांक १४/७/२०१० अन्वये शक्ती प्रदत्त समिती स्थापन करण्यांत आली आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००७२२२२२७४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-
**(डॉ.अजय भूषण पांडे)**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री, सा.प्र.वि.यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
सर्व अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई
प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.

२.	सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, सदर आदेश त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख, मंडळे, महामंडळे, प्राधिकरणे तसेच कार्यालय प्रमुखांच्या निदर्शनास आणावेत.
प्रत - निवड नस्तीसाठी / संग्रहासाठी.